**मुंबई शहरातील वाहतुकीस अडथळा करणारी वाहने, बेवारस वाहने इत्यादी करीता टोईंग प्रकल्प राबवण्यासाठी तज्ज्ञ सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे.पी.डब्ल्यू.सी. कंपनीस मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरए-१२१८/प्र.क्र.१६६/पोल-८**
दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १३ फेब्रुवारी, २०२०

**वाचा:-**

१) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दि.२०.०५.२०१५
२) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३-अ, दि.२.०६.२०१६
३) माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र.GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/o Directorate of IT-DIT (MH), दि.९.०५.२०१९.
४) शासन निर्णय समक्रमांक दि.१३.१२.२०१९.
५) मे.पी.डब्ल्यू.सी.कंपनीचे दि.४.०१.२०२० रोजीचे पत्र.
६) गृह विभाग, उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२८.०१.२०२० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

मुंबई शहरातील वाहतुकीस अडथळा करणारी वाहने, बेवारस वाहने इत्यादी करीता टोईंग प्रकल्प राबवण्यासाठी (फेज-१ करिता) तज्ञ सल्लागार म्हणून मे.पी.डब्ल्यू.सी. कंपनीस माहे-सप्टेंबर २०१९ ते नोव्हेंबर- २०१९ या तीन महिन्यांच्या कालावधीसाठी (२ Senior Consultant (१००%) आणि १ Associate Consultant (१००%) नियुक्ती करण्यात आली होती.

सदर प्रकल्प राबविण्याकरिता (१ Senior Consultant आणि १ Associate Consultant ) मे. पी. डब्ल्यू. सी. कंपनीस सल्लागार म्हणून मुदतवाढ देण्यासाठी अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२८.०१.२०२० रोजीच्या झालेल्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२८.०१.२०२० रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार सदर प्रकल्प राबविण्यासाठी मे.प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा.लि. या कंपनीच्या १ Senior Consultant पूर्ण वेळ तत्वावर आणि १ Associate Consultant पूर्ण वेळ तत्वावर प्रकल्प सल्लागार म्हणून दि.४.१२.२०१९ ते दि.३.०६.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाकडील संदर्भ क्र.३ येथे नमूद दि.९.०५.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहील. तथापि, माहिती व तंत्रज्ञान विभागाने सल्लागारांच्या मानधनासंदर्भात भविष्यात काही सुधारणा केल्यास सदर सुधारणा देखील

उपरोक्त सल्लागारांना लागू राहतील. तसेच त्यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागाने सदर कंपनीची नेमणुक (empanelment) करणे आवश्यक राहील.

३. नियुक्त करण्यात आलेल्या प्रकल्प सल्लागारांना देण्यात येणारे मानधन दरमहा प्रती व्यक्ती (man-month) तत्वानुसार असेल. सर्व सल्लागारांचे दरमहा देयक शासनास सादर करताना सल्लागारांनी महिन्याच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील/अहवाल शासनास सादर करणे आवश्यक राहील.

४. विषयाधीन प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांना मानधन देण्यासाठी येणारा खर्च मुख्यलेखाशिर्ष "बी-१, २०५५, पोलीस १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२), शहर पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (२०५५ ००९७) ५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१३१४४६०७१२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dhondu Pawar

Digitally signed by Sudhakar Dhondu Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=370693820257420609f4d474c2024d6ebdc571ea6ad2b769aa743bd3015cb5a3, serialNumber=ee05d69d6f5f431837c7addff9093dd5e97fd9ec63b0bc306c7f049f9d93d36c, cn=Sudhakar Dhondu Pawar
Date: 2020.02.13 14:47:25 +05'30'

**( सु. धों. पवार )**
अवर सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१. अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अ.मु.स. (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
६. सह पोलीस आयुक्त (वाहतूक), वरळी, मुंबई.
७. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०.सह सचिव (पोल-८) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११.मे.पीडब्ल्यूसी प्रा.लि., २५२, वीर सावरकर मार्ग, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०० ०२८
११. निवडनस्ती (पोल-८).